**पु.ल. देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई**
**“पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला महोत्सव २०१८-१९”**
**च्या खर्चास मंजूरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन पुरकपत्र क्रमांक- पुलदे-२०१८/प्र.क्र.१५८/सां.का.२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १५ नोव्हेंबर, २०१८.

वाचा :- शासन निर्णय पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्रमांक-पुलदे २०१८/प्र.क्र.१५८/सां.का.२, दि.३.११.२०१८.

**शासन पुरकपत्र :-**

संदर्भाधिन शासन निर्णयातील परिच्छेद क्र. ३ नंतर खालील परिच्छेद क्र.- ३ (अ) व परिच्छेद क्र. ४ नंतर खालील परिच्छेद क्र. ४ (अ) समाविष्ठ करण्यात येत आहे.

३(अ) शासनाने अकादमीमार्फत आयोजित कार्यक्रमासाठी विनामुल्य वापरावयाच्या सत्रांची मर्यादा शासन निर्णय क्र. पुलदे-२०१३ /प्र.क्र. १३४/सां.का.२ दि. ३.३.२०१५ अन्वये निश्चित केली असून त्यांचे पालन करणे आवश्यक राहील. प्रस्तूत महोत्सवावर आयोजन करताना विहित कार्यपध्दतीचा व विहित अटी व शर्तीचा अवलंब करणे व उक्त महोत्सवावर झालेल्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र दि. ३१.१२.२०१८ पूर्वी सादर करणे आवश्यक राहिल.

पु. ल. देशपांडे महाराष्ट्र कला महोत्सव २०१८-१९ “आयोजनाकरिता रूपये ४९,७५,०००/- (अक्षरी रुपये एकोणपन्नास लाख पंच्याहत्तर हजार फक्त) संक्षिप्त देयकावर आहरीत करण्यास खालील अटींच्या अधिनतेने मान्यता देण्यात येत आहे.

**(अ)** शासन परिपत्रक क्र. मुंविनि-२०१७/प्र.क.३८/१७/विनियम, दि.१८.१२.२०१७ मधील सुचनेनुसार (२२०५ १४६३) या लेखाशिर्षाखाली दि. ३०.९.२०१८ यापुर्वीचे तपशिलवार देयक प्रलंबित नाहीत.

**(आ)** दि. ३०.९.२०१८ नंतर च्या तपशिलवार देयकांचा त्वरेने निपटारा करण्यात येईल.

**(इ)** या संक्षिप्त देयकाचे तपशिलवार देयक एक महिन्याच्या आत सादर करण्यात येईल.

**(ई)** खर्च नियमित देयकाव्दारे करणे शक्य नसून त्यासाठी संक्षिप्त देयकावर रक्कम काढणे अनिवार्य आहे.

**(उ)** या संक्षिप्त देयकाचे तपशिलवार देयक विहित मुदतीत सादर करण्याची व्यक्तिगत जबाबदारी आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील.

**(ऊ)** मासिक निधी विवरणपत्रानुसार या करिता निधी उपलब्ध आहे.

**(ऋ)** प्रलंबित तपशिलवार देयक लवकरात लवकर सादर करण्याच्या अटीच्या अधिन प्रस्तावास मान्यता दर्शविण्यात येत आहे.

सदर शासन पुरकपत्र वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३२६/२०१८/व्यय-१५, दि.१३.११.२०१८ व अनौपचारिक संदर्भ क. ५६२/२०१८/ विनियम, दि. १५.११.२०१८ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन पुरकपत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक क्र. २०१८१११५१७३६३३९७२३ असा आहे. हे शासन पुरकपत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Sawant Balasaheb Ishwar
Date: 2018.11.15 17:48:24 +05'30'

**( बाळासाहेब ईश्वर सावंत )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) प्रकल्प संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई.
४) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) मुंबई.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई .
६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७) उप सचिव, वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) अवर सचिव, (अर्थसं.) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) निवड नस्ती, सां.का.२.